समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२०२आय७४६)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२०२आय७५५)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र.०४/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २५ ऑगस्ट, २०२०

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
२) केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालयाचे पत्र क्र.F.No.७-२/२०२०-IS.१२(SC), दि.२७.४.२०२०
३) शालेय शिक्षण विभागाची नस्ती क्र.निधिवि-२०२०/प्र.क्र.५०/प्रशिक्षण

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षण अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०३) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२०२आय७४६, खाली रु.२७१९५.७५ लाख तर (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२०२आय७५५ खाली रु.१२०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.१६.४.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि Covid-१९ च्या पार्श्वभूमीवर समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण योजनेसाठी वित्त विभागामार्फत या योजनेकरिता सद्यस्थितीत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर एकूण अर्थसंकल्पीत तरतूदीच्या लेखाशिर्ष २२०२आय७४६ (केंद्र हिस्सा ६०टक्के) मध्ये रु.१०८.१७ लाख तसेच लेखाशिर्ष २२०२आय७५५ (राज्य हिस्सा ४०टक्के) मध्ये रु.७२.११ लाख इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत शालेय शिक्षण विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार समग्र शिक्षक अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी २२०२आय७४६ (केंद्र हिस्सा ६०टक्के) लेखाशिर्षाखाली रु.१०८.१७ लाख तसेच २२०२आय७५५ (राज्य हिस्सा ४०टक्के) लेखाशिर्षाखाली रु.७२.११ लाख असा एकूण रु.१८०.२८ लाख इतका निधी खालील तक्यात नमूद उद्दिष्टांकरिता प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दिष्ट | लेखाशिर्ष | (रुपये हजारात) |
|---|---|---|---|
| | | २२०२आय७४६(केंद्र हिस्सा) | २२०२आय७५५ (राज्य हिस्सा) |
| १ | ०१, वेतन | १००४१.०० | ६६९३.०० |
| २ | ०६, दूरध्वनी, वीज व पाणी | १९४.०० | १३०.०० |
| ३ | ११, प्रवास खर्च | २९१.०० | १९४.०० |
| ४ | १३, कार्यालयीन खर्च | २९१.०० | १९४.०० |
| | **एकूण** | **१०८१७.००** | **७२११.००** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डॉऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व शालेय शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या दि.२८.७.२०२० टिप्पणीन्वये अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८२५१५१४५२७४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.08.31 12:11:42 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) शालेय शिक्षण विभाग (प्रशिक्षण), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग